डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्रासाठी पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: पंदेवि-१३२४/प्र.क्र.२२/७-अे,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३०/०३/२०२४.

**वाचा :** १) सन २०२३-२४ चे अर्थसंकल्पीय भाषण.
२)वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
३) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.कृषिवि-३७२३/प्र.क्र.६६/७अे, दि.१४.०९.२०२३
४)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.पंदेवि-१३२३/प्र.क्र.२६८/७अे, दि.१८.०१.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणात मा.उपमुख्यमंत्री तथा मा.वित्तमंत्री यांनी “कृषि व संलग्न क्षेत्रातील अत्याधुनिक तंत्रज्ञानाचे उपयोजन व प्रसार करण्यासाठी नागपूर येथे डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला अंतर्गत “आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्र” स्थापन करण्यात येईल. या केंद्रासाठी रु.२२७ कोटी ४६ लाख रुपये खर्च अपेक्षित आहे.” अशी अर्थसंकल्पीय घोषणा केली होती.

त्यानुषंगाने संदर्भ क्र.०३ येथील दि.१४/०९/२०२३ च्या शासन निर्णयान्वये डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला अंतर्गत नागपूर येथे “आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्र” स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.०४ येथील शासन निर्णय दि.१८.०१.२०२४ अन्वये सदर आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्राच्या इमारत बांधकामाच्या रु.२३५.६२ कोटी रक्कमेच्या अंदाजपत्रकीय खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, या प्रकल्पाच्या बांधकामाकरीता येणारा खर्च डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला या विद्यापीठास मागणी क्र.डी-३, २४१५ ०१,पीकसंवर्धन (कार्यक्रम) २४१५ ००९९ या लेखाशिर्षातंर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाखाली, अर्थसंकल्पीत होणाऱ्या निधीमधून भागविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात २४१५ ००९९ या लेखाशिर्षातंर्गत ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाखाली पुरेशी तरतूद उपलब्ध नसल्याने विधानमंडळाच्या माहे फेब्रुवारी,२०२४ च्या अधिवेशनात, आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्राच्या इमारत बांधकामासाठी पुरवणी मागणी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यासअनुसरुन वित्त विभागाने मागणी क्र.डी-३, २४१५ ०१,पीकसंवर्धन, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००९९ या लेखाशिर्षातंर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या उद्दिष्टाखाली, आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्राच्या इमारत बांधकामाकरीता रु.१ कोटी पुरवणी मागणी मंजूर केली आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला रु.१ कोटी निधी आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्राच्या इमारत बांधकामासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००९९, या लेखाशीर्षांतर्गत ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान या बाबीकरीता पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला रु.१ कोटी निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/ उद्दीष्ट | योजना/योजनेंतर्गत येणारे महाविद्यालय | प्रशासकीय मान्यता किंमत (अनावर्ती) | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात या प्रयोजनासाठी उपलब्ध तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मागणी क्र. डी-३, ०१ पिकसंवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम), २४१५ ००९९, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरीता अनुदान | डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्र, नागपूर. | २३५६२.१९ | १००.०० (विधानमंडळाच्या माहे फेब्रुवारी, २०२४ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध) | १००.०० |
| **एकूण -** | | | **२३५६२.१९** | **१००.००** | **१००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२२, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/ योजनांसाठी/ बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधीत कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

**३.** याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

**५.** आंतरराष्ट्रीय कृषि सुविधा केंद्र, नागपूर या प्रकल्पाच्या बांधकामाकरीता वितरीत केलेला निधी नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला यांनी, महाराष्ट्र राज्य पायाभूत

सुविधा विकास महामंडळ, मुंबई यांना ठेव अंशदान तत्त्वावर उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.

६. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१),१९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८०/का.१४३१, दि.१३.०३.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२९/२०२४/व्यय-१, दि.२०.०३.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१७२८१३१००१ असा आहे, हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f1599 84ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1 E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.30 17:38:13 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कार्पोरेशन, मुंबई.
६. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
७. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
८. सहायक लेखाधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
९. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला/ उपकोषागार अधिकारी,अकोला.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१४.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१६.कक्ष अधिकारी, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१७.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.